१. शशिकांत ओक : मला जास्त आवडले ते जयाजी शिंदे यांच्या शिकारीला जातानाचे पेंटिंग.

# 1 जयाजीराव शिंदे ग्वाल्हेरच्या राजवाड्यातून जाताना



## मनोज दाणींच्या पानिपतवरील चित्रमय ग्रंथातील काही

## पेंटींग्जवर आधारित E Book 135

खालील मेसेज व्हॉट्स ॲप वरून झाले होते. त्यातून या चित्रावर काही भाष्य केले गेले होते तेही सादर...मनोज ढाणी : हो सुरेख आहेत ते. म्हणून अगदी सुरवातीला सादर केले आहे.
एडविन लॉर्ड्स वीक्स यांचे पुर्ण चित्र मनोज ढाणींनी मला पाठवले.

**एडविन लॉर्ड वीक्स** - **हे सध्याच्या काळातील सर्वात प्रसिद्ध अमेरिकन ओरिएंटलिस्ट आहे आणि त्यांच्या काळातही ते प्रसिद्ध होते. त्यांनी पूर्वेकडील प्रवासांचे दस्तऐवजीकरण केले आणि प्रसिद्ध फ्रेंच कलाकार लिओन बोनाट यांच्या मार्गदर्शनाखाली पॅरिसमध्ये अभ्यास केला. एडविनचे पालक बोस्टनच्या एका उपनगरातील श्रीमंत मसाले आणि चहाचे व्यापारी होते आणि म्हणून त्यांनी त्यांच्या मुलाच्या चित्रकला आणि प्रवासासाठी एडविनच्या आवडीला प्रोत्साहन दिले आणि आर्थिक मदत केली. एडविन तरुण असताना त्यांनी न्यूटन येथील त्यांच्या घरापासून दक्षिण अमेरिकेतील सुरीनामपर्यंत अमेरिकेचा प्रवास केला. त्याची सर्वात जुनी चित्रे १८६७पर्यंतची आहेत.** * त्याच्या बद्दल जास्त माहिती व स्केचेस शेवटी दिली आहेत.

२. शशिकांत ओक : हातावर ससाणे धारी रक्षक इतका स्मार्ट दाखवलाय. मागील भागातील सजावट पाहता राजवाड्यातून ते बाहेर पडले असावेत.

मनोज दाणी : हो.

३. शशिकांत ओक : पायी चाललेल्या हुजऱ्याची एका हाताने घोड्यावर हाताची ठेवण जवळीक दाखवते. राजा शिकार करताना असे शिपाई देखील नेम धरून सावजाला टिपतात. पण नाव होते महाराजांच्या नेमबाजीचे! अर्थात हे जयाजीरावांच्या बाबत असेल असे नाही...





४. शशिकांत ओक :सावलीच्या तिरकेपणातून सकाळचे११ नंतरच्या वेळी ते असेल का?
मनोज दाणी : हो असेल
मनोज दाणी : एक एक माणूस पाहण्यासारखा आहे. ५. शशिकांत ओक : हे चित्र फारच प्रभावी आहे. फुटपाथवरील सावलीत बसून येणाऱ्या-जाणाऱ्या ग्राहकांसाठी (सध्याच्या पानठेल्यांप्रमाणे?)हुक्का पाणी करायची सोय आवडली. पाठ टेकून टेकून मळलेली भिंत हुबेहुब दिसते. रस्त्याच्या फुटपाथची रचना सिमेंटच्या चौकोनी ब्लॉक्स सारखी आहे! नाच गाणी करणाऱ्या मुली किंवा साहसी खेळ करून लोकरंजन करणारे कलाकार शक्यतो राजेसाहेबांच्या नजरेत दिसावे असे वाटून या मुलीला पुढे केले गेले असावे असा आभास वाटतो. मनोज दाणी: हो.





६. हवेलीच्या गच्चीवरील कलाकुसर आणि पोपटांच्या बसण्याने नैसर्गिक उठाव आला आहे



.

७.घोड्यांच्या रंगातील विविध छटा व आवेश सुंदर टिपला आहे.




८. एडविन लॉर्ड विक्स यांचा स्टूडिओ. पेंटिंग्ज किती भव्य आणि मोठ्या आकाराची असतात ते त्यांच्या आकारमानाची तुलना करून समजून येते. भारतीय कलाकारांना अशी उत्कट चित्रे का काढता येऊ नयेत असे राहून राहून वाटत राहते.

एडविन लॉर्ड विक्स E Book 135 ११ पेशव्यांच्या लढाया त्यांची रफ स्केचेस

